अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील महत्वाच्या स्थळांचा विकास करणे याअंतर्गत दिक्षा भूमी, नागपूर येथील प.पू.डॉ.बाबासाहेब आंबेडकर समितीव्दारे मध्यवर्ती स्मारकारिता विद्युत पुरवठा व जनरेटर लावण्याकरिता अनुदान उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सान्यावि-२०१६/प्र.क्र.२४०/बांधकामे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १० जुलै, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१६/१२/२०१५.
२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ मावक/ऐतिहासिक स्थळ / दिक्षाभूमी/नागपूर/२०१५-१६/का-१२/२५, दि.२१/४/२०१६.
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०१६/ प्र.क्र.४३७/ बांधकामे, दि.६/१/२०१७.
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०१६/ प्र.क्र.४३७/ बांधकामे, दि.३०/३/२०१७.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मान्यवर व्यक्तींची स्मारक बांधणे तसेच महत्वाच्या सांस्कृतिक व ऐतिहासीक स्थळांचा विकास करण्याच्या दृष्टीने स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याविषयीचे निकष, मार्गदर्शक तत्वांना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या विहित कार्यपध्दतीनुसार संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये, आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी दिक्षा भूमी, नागपूर येथील प.पू.डॉ.बाबासाहेब आंबेडकर समितीव्दारे मध्यवर्ती स्मारक इमारतीकरिता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीतर्फे विद्युत पुरवठाकरिता रु.११,२०,८९०/- व जनरेटर लावण्याकरिता रु. १९,५८,९७६/- असे एकूण ३०,७९,८६६/- (३१,००,०००/-) इतक्या खर्चाचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे. सदर अंदाजपत्रक अधिक्षक अभियंता, नागपूर सुधार प्रन्यास नागपूर यांच्याकडून प्राप्त झालेले आहे. मा.मंत्री,(सा.न्या.व वि.स.)यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीच्या दि. १३/७/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्तावास खास बाब म्हणून तत्वत: मान्यता देण्यात आली. याबाबतचे आदेश संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. तद्नुषंगाने सदर प्रस्तावाच्या रु. ३१,००,०००/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी शासनास पाठविलेल्या दिक्षा भूमी, नागपूर येथील प.पू.डॉ.बाबासाहेब आंबेडकर समितीव्दारे मध्यवर्ती स्मारकारिता विद्युत पुरवठा व जनरेटर लावण्याकरिता रु. ३१,००,०००/- इतक्या रक्कमेच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

१) सक्षम प्राधिकाऱ्यानी सदर कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिल्यानंतरच विहित प्रक्रियेप्रमाणे अर्थसंकल्पीत तरतूदीच्या अधिन राहून काम सुरु करावे.

२) संबंधित सहाय्यक आयुक्त यांनी कामाचा वेळोवेळी आढावा घेवून त्याबाबतचा प्रगती अहवाल आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचेमार्फत शासनास सादर करावा.

२. संदर्भ क्र. ४ येथील दि. ३०/३/२०१७ च्या शासन निर्णयाच्या सोबतच्या विवरणपत्र “अ” मध्ये नमूद प्रस्तावांसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२),स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतूद, ठेव अंशदान स्वरुपात समन्वयक तथा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या दिक्षा भूमी, नागपूर येथील प.पू.डॉ.बाबासाहेब आंबेडकर समितीव्दारे मध्यवर्ती स्मारकारिता विद्युत पुरवठा व जनरेटर लावण्याकरिता रु. ३१,००,०००/- इतक्या रक्कमेचे काम ठेव अंशदान स्वरुपात समन्वयक तथा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात आलेल्या तरतूदीतून करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर योजनेअंतर्गत आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक,आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ (२) मध्ये नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी आयुक्त, समजाकल्याण, पुणे यांची राहील.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरहु शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०७१०१५५१००८८२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.07.10 15:51:32 +05'30'

**( अ. कों. आहिरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२. उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
४. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
६. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
७. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
८. सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१०.सचिव, प.पू.डॉ.बाबासाहेब आंबेडकर समिती, दीक्षाभूमी, नागपूर
११.मा.मंत्री (सा.न्या.)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
१२.मा.राज्यमंत्री (सा.न्या.)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
१३.निवडनस्ती.